**जून ते सप्टेंबर, २०२४ या कालावधीत अतिवृष्टीमुळे व पुरामुळे शेतजमीनीच्या झालेल्या नुकसानीकरिता मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२४/प्र.क्र.२२०/म-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२५

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.०३.२०२३
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या-२/नै.आ/२०२४, ज-३, दि.०२.०८.२०२४.
४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.मह-३/नैआ./कावि-३२३, ३४९+३५०, ३५१,३५९, ३६२ व ३७४ दि.२७.०८.२०२४, दि.१८.०९.२०२४, दि.१९.०९.२०२४, दि.२४.०९.२०२४, दि.३०.०९.२०२४ व दि.१५.१०.२०२४
५) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७(५)/नै.आ.व्य./गडचिरोली-जून जुलै, २०२४/कावि-३७२/२०२४, दि.०९.०९.२०२४.
६) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७(५)/नै.आ.व्य./वर्धा-जून जुलै, २०२४/कावि-३७३/२०२४, दि.०९.०९.२०२४.
७) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७(५)/नै.आ.व्य/चंद्रपूर-जून जुलै,२०२४/कावि ३७५/२०२४, दि.१०.०९.२०२४.
८) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७(५)/नै.आ.व्य./नागपूर-जुलै, २०२४/कावि-३७८/ २०२४, दि.१३.०९.२०२४.
९) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७(५)/नै.आ.व्य./चंद्रपूर-३१ ऑगस्ट ते ४ सप्टेंबर, २०२४/कावि-४०६/२०२४, दि.०३.१०.२०२४.
१०) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.उपआ/नैआ./पुर्नव/म.स./कावि-१११/२०२४, दि.१८.०९.२०२४
११) विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर यांचे पत्र क्र.२०२४/मशाका/नैआ/कावि-११४१, ११९२, १२२१ व १२४२, दि.३०.०९.२०२४, दि.०१.१०.२०२४, दि.०७.१०.२०२४ व दि.०८.१०.२०२४

प्रस्तावना:

अतिवृष्टी, पूर व चक्रीवादळ या सारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्यास पुढील हंगामामध्ये उपयोगी पडावे याकरिता शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान (Input subsidy) स्वरूपात एका हंगामात एक वेळेस याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून विहित दराने मदत देण्यात येते. तसेच, राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या इतर मान्य बाबींकरिता देखील विहित दराने मदत देण्यात येते. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.०३.२०२३ अन्वये अतिवृष्टी व पूर यासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे राज्यात विविध जिल्ह्यात होणाऱ्या शेतजमीनीच्या नुकसानीकरिता बाधितांना मदत प्रदान करण्यास शासनाची मान्यता देण्यात आलेली आहे.

जून ते सप्टेंबर, २०२४ या महिन्यात अतिवृष्टीमुळे शेतजमीनीच्या झालेल्या नुकसानीसाठी विभागीय आयुक्त, नाशिक, पुणे, नागपूर, अमरावती व छ.संभाजीनगर यांचेकडून संदर्भ क्र.३ ते ११ च्या पत्रान्वये निधी मागणीचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत.

**शासन निर्णय**:

जून ते सप्टेंबर, २०२४ या कालावधीत राज्यात झालेल्या अतिवृष्टीमुळे व पूर परिस्थितीमुळे शेतीपिके व शेतजमीनीच्या नुकसानीसाठी बाधितांना मदत देण्याकरिता राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या दरानुसार एकूण **रु.२९२५.६१ लक्ष (अक्षरी रुपये एकोणतीस कोटी पंचवीस लक्ष एकसष्ट हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे वर अनुक्रमांक २ येथे नमूद दि.२४.०१.२०२३ अन्वये सूचित केल्यानुसार आवश्यकतेनुसार कार्यासन म-११ यांनी हा निधी वितरित करावा. जिल्हाधिकारी यांनी वर अनुक्रमांक २ येथे नमूद दि.२४.०१.२०२३ अन्वये सूचित केल्यानुसार या प्रस्तावाअंतर्गत असलेल्या सर्व लाभार्थ्यांची माहिती विहित नमुन्यात तयार करुन ती जास्तीत जास्त एक महिन्याच्या आत संगणकीय प्रणालीवर भरावी. ही माहिती भरतांना -

अ) चालू हंगामामध्ये यापूर्वी सर्व विभागांना शेतीजमीनीच्या नुकसानीकरिता वितरीत करण्यात आलेल्या मदतीच्या निधीमध्ये या प्रस्तांवातर्गत मागणी करण्यात आलेल्या निधीचा समावेश नाही याची दक्षता घ्यावी. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून विहित दराने मदत देण्यात येत असल्याची खात्री करावी.

ब) शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.२७.०३.२०२३ नुसार, महसूल अभिलेख्यानुसार शेतजमीनीचे मालक असलेल्या फक्त अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना विहित दराने जास्तीत जास्त २ हेक्टरच्या मर्यादेत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. ही मदत देताना केंद्र शासनाने चक्रीवादळ, पूर इत्यादी नैसर्गिक आपत्तीकरिता विहित केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याची खात्री सर्व संबंधितांनी करावी.

४. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या आदेशाव्दारे तसेच यापूर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाव्दारे नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतकऱ्यांना दिलेला मदतीचा निधी बँकांनी कर्ज खात्यात अथवा अन्यथा वसुलीसाठी वळती करु नये याकरिता जिल्हाधिकारी यांनी सर्व बँकांना आवश्यक त्या सूचना निर्गमित कराव्यात. या सर्व सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र.सी-६, मुख्य लेखाशिर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर, चक्रीवादळे इत्यादी ११५, जमीनीतील वाळू/गाळ/क्षार काढून टाकण्यासाठी शेतकऱ्यांना सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) जमीनीतील वाळू/ चिकनमाती व क्षार काढून टाकण्यासाठी शेतकऱ्यांना सहाय्य, डोंगराळ शेतीवरील गाळ काढणे, मत्स्य क्षेत्रातील गाळ काढणे व ती पूर्ववत करुन त्याची दुरुस्ती करणे, भूस्खन, हिमस्खन व नदीच्या रुपांतरामुळे झालेले नुकसान (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (सर्शत) (२२४५ ०२९१) अंतर्गत उपलब्ध केलेल्या निधीमधून खर्च करण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०२२५१७२८२१२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2025.02.25 17:32:09 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
५. मा. मंत्री (मदत, पुनर्वसन व आपत्ती व्यवस्थापन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
७. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
८. विभागीय आयुक्त, नाशिक, पुणे, नागपूर, अमरावती व छ.संभाजीनगर
९. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१०. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१४. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१७. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२४/प्र.क्र.२२०/म-३,**
**दि.२५ फेब्रुवारी, २०२५ सोबतचे प्रपत्र**

**जून ते सप्टेंबर, २०२४ या कालावधीमध्ये शेतजमीनीच्या झालेल्या नुकसानीकरिता**
**वितरित करावयाच्या निधीचा तपशिल**

| अ. क्र. | जिल्हा | कालावधी (प्रस्तावाचा दिनांक) | बाधित क्षेत्र - खरडून गेलेली जमीन (हेक्टर) | बाधित शेतकरी संख्या | खरडून गेलेली जमीनीकरिता निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| **विभागीय आयुक्त, नाशिक यांचे प्रस्ताव** | | | | | |
| १ | जळगाव | जून ते जुलै, २०२४ (दि.०२.०८.२०२४ ) | २७.६९ | १४३ | १३.०१ |
| **एकूण नाशिक विभाग** | | | **२७.६९** | **१४३** | **१३.०१** |
| **विभागीय आयुक्त, पुणे यांचे प्रस्ताव** | | | | | |
| १ | पुणे | जून -जुलै, २०२४ (दि.२७.०८.२०२४) | ६७.१९ | ६६२ | ३२.०० |
| २ | पुणे | ऑगस्ट, २०२४ (दि.१८.०९.२०२४) | ९.५४ | १०३ | ४.८५ |
| ३ | सातारा | | ४८.८७ | ५५० | २०.०८ |
| ४ | सांगली | जुलै,२०२४ (दि.१९.०९.२०२४) | १.१५ | १७ | ०.६५ |
| ५ | सांगली | ऑगस्ट, २०२४ (दि.२४.०९.२०२४) | ०.२५ | ३ | ०.१७ |
| ६ | कोल्हापूर | जून, २०२४ (दि.३०.०९.२०२४) | १.७२ | २६ | १.३० |
| ७ | सातारा | सप्टेंबर, २०२४ (दि.१५.१०.२०२४) | ०.८५ | ९ | ०.२७ |
| **एकूण पुणे विभाग** | | | **१२९.५७** | **१३७०** | **५९.३२** |
| **विभागीय आयुक्त, नागपूर यांचे प्रस्ताव** | | | | | |
| १ | गडचिरोली | जून ते जुलै, २०२४ (दि.०९.०९.२०२४) | ५९.९४ | ३८५ | ११.५५ |
| २ | वर्धा | जून ते जुलै, २०२४ (दि.०९.०९.२०२४) | ३९१.८६ | १४०४ | १७९.१४ |
| ३ | चंद्रपूर | जून ते जुलै, २०२४ (दि.१०.०९.२०२४) | २१६३.५५ | ५३०९ | ७४८.८९ |
| ४ | नागपूर | जुलै, २०२४ (दि.१३.०९.२०२४) | ३०३.३० | ८७५ | १४२.७४ |
| ५ | चंद्रपूर | ऑगस्ट ते सप्टेंबर, २०२४ (दि.०३.१०.२०२४ ) | ९१.२१ | ७६ | १६.४४ |
| **एकूण नागपूर विभाग** | | | **३००९.८६** | **८०४९** | **१०९८.७६** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **विभागीय आयुक्त, अमरावती यांचे प्रस्ताव** | | | | | |
| १ | अमरावती | जून ते जुलै, २०२४ (दि.१८.०९.२०२४) | ७६.२३ | ३९६ | ३५.८३ |
| २ | अकोला | | २.८० | १८ | ०.५० |
| ३ | यवतमाळ | | ३२४.५३ | ८६५ | ५८.४२ |
| ४ | बुलढाणा | | ७८२.९८ | ३२७६ | ३३६.७१ |
| ५ | वाशिम | | १५.९४ | २८६ | २.८७ |
| **एकूण अमरावती विभाग** | | | **१२०२.४८** | **४८४१** | **४३४.३३** |
| **विभागीय आयुक्त, छ. संभाजीनगर यांचे प्रस्ताव** | | | | | |
| १ | परभणी | ऑगस्ट व सप्टेंबर,२०२४ (दि.३०.०९.२०२४) | ७९३.६० | १६०७ | ३६७.२३ |
| २ | लातूर | सप्टेंबर, २०२४ (दि.०१.१०.२०२४) | ०.३० | ३ | ०.१४ |
| ३ | हिंगोली | सप्टेंबर, २०२४ (दि.०७.१०.२०२४) | १४३४.५५ | ५११४ | ६६४.९१ |
| ४ | धाराशिव | सप्टेंबर, २०२४ (दि.०८.१०.२०२४) | ५.५५ | ५१ | २.६१ |
| ५ | नांदेड | सप्टेंबर, २०२४ (दि.०७.१०.२०२४) | १५८५.०० | १८८७ | २८५.३ |
| **एकूण छ. संभाजीनगर विभाग** | | | **३८१९.००** | **८६६२** | **१३२०.१९** |
| **एकूण राज्य** | | | **८१८८.६०** | **२३०६५** | **२९२५.६१** |